केंद्र शासनाच्या “राज्यांना भांडवली गुंतवणुकीसाठी विशेष सहाय्य २०२४-२५ या योजनेच्या भाग-१३ नगर नियोजन सुधारणा” अंतर्गत निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सिआयडी-३३२५/प्र.क्र.११/नवि-१०**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २० मार्च, २०२५

**वाचा :-**

१) भारत सरकार, वित्त मंत्रालय यांचे पत्र क्र.F.No.४४(१)/PF-S/२०२४-२५ (CAPEX), दि.२६.०२.२०२४.
२) भारत सरकार, वित्त मंत्रालय यांचे पत्र क्र.F.No.४४(१)/PF-S/२०२४-२५ (CAPEX), दि.२०.१२.२०२४.
३) भारत सरकार, वित्त मंत्रालय यांचे पत्र क्र.F.No.४४(१)/PF-S/२०२४-२५ (CAPEX)-Maharashtra, दि.१९.०३.२०२५.
४) भारत सरकार, वित्त मंत्रालय यांचे पत्र क्र.F.No.४४(१)/PF-S/२०२४-२५ (CAPEX)-Part-XIII-SACE-11 दि.१९.०३.२०२५.
५) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.५१/२०/कोषा प्रशा-५, दि.१३.०३.२०२० व दि.०३.०३.२०२१.
६) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०२१/प्र.क्र.३५/कोषा प्रशा-४, दि.०१.०७.२०२१.
७) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.सिआयडी-३३२२/प्र.क्र.९३/नवि-१०, दि.७.१०.२०२२ व दि.१७.१०.२०२२.
८) वित्त विभाग, पत्र क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.१८/अर्थबळ, दि.०२.१२.२०२४

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या "राज्यांना भांडवली गुंतवणुकीसाठी विशेष सहाय्य २०२४-२५" या योजनेंतर्गत राज्य शासनास भांडवली गुंतवणूक प्रकल्पांसाठी ५० वर्षांच्या बिनव्याजी कर्जाच्या स्वरूपात विशेष आर्थिक सहाय्य प्रदान करण्यात येत आहे. यासंदर्भात केंद्र शासनाच्या वित्त विभागाने दि.२६.०२.२०२४ रोजीच्या पत्रान्वये उक्त योजनेची मार्गदर्शक तत्वे निर्गमित केली आहेत.तसेच केंद्र शासनाने दि.२०.१२.२०२४ रोजीच्या पत्रान्वये भाग-१३ नगर नियोजन सुधारणासंदर्भात मार्गदर्शक सुचना निर्गमित केल्या आहेत. केंद्र शासनाच्या "राज्यांना भांडवली गुंतवणुकीसाठी विशेष सहाय्य २०२४-२५ भाग-१३ नगर नियोजन सुधारणा” अंतर्गत संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण, पुणे यांचकडून प्राप्त झालेला प्रोत्साहन निधीचा प्रस्ताव केंद्र शासनास पाठविण्यात आला होता. सदर प्रोत्साहन निधीतून घ्यावयाच्या प्रकल्पांची यादी महानगरपालिका, ठाणे, नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण,

नागपूर सुधार प्रन्यास, महानगरपालिका ,पिंपरी-चिंचवड, पुणे स्मार्ट सिटी डेव्हलपमेंट कार्पोरेशन, पुणे महानगरपालिका, पुणे व सिडको महामंडळ यांचेकडून प्राप्त करून केंद्र शासनास वित्त विभागामार्फत पाठविण्यात आली होती. केंद्र शासनाच्या संदर्भाधीन क्र.३ येथील दि.१९.०३.२०२५ च्या आदेशान्वये रु.२६६.५०/-कोटींच्या प्रकल्पांना मंजुरी प्राप्त झाली आहे. तसेच केंद्र शासनाच्या संदर्भाधीन क्र.४ येथील आदेशान्वये रु.२६६.५०/- कोटी निधी वितरीत करण्यात आलेला आहे. सदर निधी संबंधित कार्यान्वयीन यंत्रणांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

०१. केंद्र शासनाच्या "राज्यांना भांडवली खर्चासाठी विशेष सहाय्य २०२४-२५ भाग-१३ नगर नियोजन सुधारणा" याअंतर्गत केंद्र शासनाने मंजूर केलेल्या निधीनुसार सन २०२४-२५ या चालू वित्तीय वर्षातील अर्थसंकल्पीय तरतूदीमधून खालील तक्त्यात नमूद प्रकल्पांसाठी **रु.२६६,५०,००,०००/- (अक्षरी दोनशे सहासष्ट कोटी पन्नास लाख फक्त)** प्रकल्पनिहाय संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना/ अन्य संस्थांना वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रू.कोटीत)

| अ. क्र. | प्रकल्पाचे नाव | केंद्र शासनाकडून मंजूर निधी | या आदेशान्वये वितरीत करावयाच्या निधी | अंमलबजावणी यंत्रणा |
|---|---|---|---|---|
| 1 | Various Infrastructure Development Works in Thane Municipal Corporation | ११५.०० | ११५.०० | ठाणे महानगरपालिका |
| 2 | DP Roads and Bridges in NMRDA area | ७५.०० | ७५.०० | नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, नागपूर **(एकूण रु.८५ कोटी)** |
| 3 | Drainage, Storm Water Drains and Security wall in NMRDA | १०.०० | १०.०० | |
| 4 | Construction of Road, Storm Drain and Play Ground at Various Mouza"s of East Division NIT | २२.०० | २२.०० | नागपूर सुधार प्रन्यास **(एकूण रु.६६.५० कोटी)** |
| 5 | Construction of Road, Storm Drain and Play Ground at Various Mouza"s of West Division NIT | ८.०० | ८.०० | |
| 6 | Construction of Road, Storm Drain and Play Ground at Various Mouza"s of North Division NIT | १०.०० | १०.०० | |
| ७ | Construction of Road, Storm Drain and Play Ground at Various Mouza"s of South Division NIT | २६.५० | २६.५० | |
| | एकूण | **२६६.५०** | **२६६.५०** | |

०२. उपरोक्त प्रकल्पांसाठी वितरीत केलेला निधी "मागणी क्रमांक - एफ-०७ दत्तमत, ६२१७, नगर विकासासाठी कर्जे ०१ राज्य भांडवली विकास १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांसाठी कर्जे (०१) केंद्र शासनाकडून राज्यांना भांडवली गुंतवणुकीसाठी विशेष सहाय्य योजनेंतर्गत बिनव्याजी कर्जे

(केंद्र हिस्सा १००% (०१) (०३) नागरी सुधारणा (योजना भाग-६) (कार्यक्रम), (६२१७०९९३) ५५ कर्जे व आगाऊ रकमा” या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.

०३. सदरचा निधी पायाभुत सुविधांच्या नवीन कामावर खर्च करावयाचा असून, या निधीतून देखभाल दुरुस्तीची कामे घेता येणार नाहीत, याची खबरदारी घेण्यात यावी.

०४. उपरोक्त लेखाशीर्षाखालील निधी आहरित करण्यासाठी नगर विकास विभागाचे कक्ष अधिकारी, नवि-५ (रोखशाखा), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना “आहरण व संवितरण अधिकारी” तसेच सह/उप सचिव (नवि-१०), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना “नियंत्रक अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०५. शासन निर्णयातील परिच्छेद क्र. १ मध्ये नमूद करण्यात आलेली रक्कम आहरण व संवितरण अधिकारी यांनी अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे देयके सादर करून आहरीत करुन या योजनेच्या संबंधित खात्यामध्ये वर्ग करण्यासाठी त्यांना अधिकार प्रदान करण्यात येत आहेत. याबाबतच्या खर्चमेळाची कार्यवाही नवि-३१ कार्यासनाने करावी. सदरचे निधी वितरण हे सशर्त स्वरुपाचे आहे.

०६. संबंधित अंमलबजावणी यंत्रणांनी सदरचा निधी दि.३१.०३.२०२५ रोजीपर्यंत खर्च करणे बंधनकारक आहे.

०७. केंद्र शासनाच्या “राज्यांना भांडवली खर्चासाठी विशेष सहाय्य २०२४-२५ भाग-१३ नागरी नियोजन सुधारणा” याअंतर्गत प्राप्त निधीसाठी संचालक, नगर रचना व मुल्यनिर्धारण विभाग, पुणे यांना “समन्वय अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी या योजनेसाठी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्था / अन्य संस्था यांना वितरीत केलेल्या निधीच्या खर्चाचे व उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यासंदर्भात समन्वय करावा.

०८. केंद्र शासनाच्या “राज्यांना भांडवली खर्चासाठी विशेष सहाय्य २०२४-२५ भाग-१३ नागरी नियोजन सुधारणा” याअंतर्गत वितरीत करण्यात आलेल्या निधीसंदर्भात संचालक, नगर रचना व मुल्यनिर्धारण विभाग, पुणे व संचालक, नगरपरिषद संचालनालय, मुंबई यांनी महालेखापाल यांनी विहित केलेल्या नमुन्यात लेखे ठेवावेत.

०९. सदर प्रकल्पाच्या स्थानिक स्वराज्य संस्थांच्या स्तरावरील अंमलबजावणी संदर्भात उद्भवलेल्या बाबी व विधानमंडळ विषयक बाबी नगर विकास विभागातील संबंधित कार्यासनाकडून हाताळण्यात येतील.

१०. या आदेशान्वये वितरीत केलेला निधी केंद्र शासनाने ज्या प्रकल्पांसाठी मंजूर केला आहे, त्याच प्रकल्पांसाठी व त्यातील प्रयोजनासाठीच दि.३१.०३.२०२५ पर्यंत खर्च होईल याची खबरदारी आयुक्त, महानगरपालिका ठाणे, महानगर आयुक्त, नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण व सभापती, नागपूर सुधारण प्रन्यास, नागपूर यांनी घ्यावी तसेच या आदेशान्वये वितरीत केलेल्या निधीच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास दि.१०.०४.२०२५ पर्यंत सादर करावे.

११. सदर रक्कम वितरीत झाल्यानंतर या रक्कमेतून खर्च केलेल्या रक्कमांचा तपशील प्रत्येक महिन्याला राज्य शासनास सह/उप सचिव (नवि-१० / नवि-३१), नगर विकास विभाग, मंत्रालय यांना सादर करण्यात यावा. तसेच लेखापरिक्षणासाठी शासनांस/शासनाने नियुक्त केलेल्या यंत्रणेस उपलब्ध करून देण्यात यावा.

१२. केंद्र शासनाच्या वित्त विभागाने दि.२६.०२.२०२४, दि.०९.०८.२०२४ व दि.२८.०१.२०२५ रोजीच्या पत्रातील मार्गदर्शक सूचनांचे काटेकोरपणे पालन करुन प्रकल्पनिहाय वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करावा तसेच राज्य शासनाच्या दि.०१.०७.२०२१ अन्वये दिलेल्या सूचनांचे पालन करणे बंधनकारक आहे.

१३. सदर निधी वितरण आदेश केंद्र शासनाचा संदर्भाधीन क्र.४ येथील आदेशास व वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र.५०/२०२५/अर्थबळ दि. २०.०३.२०२५ अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०३२०१७१३४९२२२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

SUBRAO NARAYAN SHINDE

Digitally signed by SUBRAO NARAYAN SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E5BB5862D0E131A274D92F7A1ACEF953E01301C1B0FB615DC6CCE4812BDED257, cn=SUBRAO NARAYAN SHINDE
Date: 2025.03.20 17:14:43 +05'30'

**( सुबराव शिंदे )**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य,यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री (नगर विकास), यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अपर मुख्य सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव ( नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. महानगर आयुक्त, नागपूर महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, नागपूर.
१०. सभापती, नागपूर सुधार प्रन्यास, नागपूर.
११. संचालक, नगरपरिषद संचालनालय, मुंबई.
१२. संचालक, नगर रचना आणि मुल्यनिर्धारण विभाग, पुणे.
१३. आयुक्त, ठाणे महानगरपालिका
१४. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, मुंबई / नागपुर
१५. महालेखापाल, (लेखापरिक्षा)- १/२, मुंबई/ नागपुर
१६. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
१७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१८. उप सचिव (नवि-४, नवि-३१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१९. निवड नस्ती (नवि-१०).